महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ सेवांतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांसाठी पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रम प्रवेशाकरीता कमाल वयोमर्यादेची अट शिथील करणेबाबत. . .

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२३/प्र.क्र.३९८/सेवा ३**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार,मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २४ जुलै, २०२३.

**वाचा :** १. शासन निर्णय क्र. मवैअ-२०१९/प्र.क्र.१६५/सेवा-३, दि.१९ मार्च, २०१९.
२. शासन निर्णय क्र.मवैअ-२०२२/प्र.क्र.५७८/सेवा-३, दि.०७ नोव्हेंबर, २०२२.
३. शासन निर्णय क्र.मवैअ-२०२३/प्र.क्र.३०१/सेवा-३, दि.१९ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ सेवांतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांसाठी (In Service Medical Officers) पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रम प्रवेश सुधारित निवड नियमावली याबाबतच्या शासन निर्णय क्र.मवैअ-२०१९/प्र.क्र.१६५/सेवा-३, दि.१९ मार्च, २०१९ मधील परिच्छेद क्र.४.३ येथील तरतुदीनुसार वैद्यकीय अधिकाऱ्यांचे वय पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या (NEET PG) प्रवेशपरीक्षेच्या दिनांकास ४५ वर्षापेक्षा जास्त नसावे अशी अट आहे.

२. तथापि, कोरोना जागतिक महामारीमध्ये राज्यातील सर्वच वैद्यकीय अधिकारी यांनी अहोरात्र रुग्णांना प्रतिबंधात्मक उपचारात्मक सेवा दिलेल्या होत्या. त्यांनी कर्तव्यभावनेने कोरोना काळात कोविड योध्दा म्हणून अहोरात्र काम केले. सेवांतर्गत वैद्यकीय अधिकारी यांना पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रमास प्रवेश घेण्याची इच्छा असतानाही सन २०२० व सन २०२१ मधील कोरोना महामारी परिस्थितीमुळे NEET पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेशपरीक्षेकरीता आवश्यक तयारी करता आली नाही. याअनुषंगाने विभागातील सेवांतर्गत वैद्यकीय अधिकारी यांनी NEET PG-२०२३ या पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरीता वयाच्या अटीमध्ये शिथिलता मिळणेबाबत विनंती केली आहे. यासंदर्भात शासनस्तरावर झालेल्या बैठकीत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने कोविड-१९ साथरोगाच्या पार्श्वभुमीवर सरळसेवा व इतर स्पर्धा परीक्षांमध्ये दिलेल्या वयोमर्यादेची सूटीच्या धर्तीवर सेवांतर्गत वैद्यकीय अधिकारी यांचेकरीताही सन २०२० व सन २०२१ मधील कोविड परिस्थिती विचारात घेता NEET PG-२०२२ व NEET PG-२०२३ या पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेश परीक्षेकरीता कमाल वयोमर्यादेची अट शिथिल करण्याचा निर्णय घेण्यात आला. NEET PG-२०२२ या प्रवेशपरीक्षेकरीता वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये यापूर्वीच देण्यात आलेली असल्याने आता

NEET PG-२०२३ या पदव्युत्तर प्रवेश परीक्षेकरीता कमाल वयोमर्यादेची अट “एक वेळची विशेष बाब” म्हणून शिथिल करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ सेवांतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांसाठी (In Service Medical Officers) पदव्युत्तर पदवी/ पदविका अभ्यासक्रम प्रवेश सुधारित निवड नियमावली याबाबतच्या शासन निर्णय क्र. मवैअ-२०१९/प्र.क्र.१६५/सेवा-३, दि.१९ मार्च, २०१९ मधील परिच्छेद क्र.४.३ तसेच वाचा क्र.३ येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.४.३ येथील “वैद्यकीय अधिकाऱ्यांचे वय पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या (NEET PG) प्रवेशपरीक्षेच्या दिनांकास ४५ वर्षापेक्षा जास्त नसावे” ही अट “एक वेळची विशेष बाब” म्हणून पूर्वलक्षी प्रभावाने NEET PG-२०२३ या पदव्युत्तर प्रवेशपरीक्षेकरीता शिथील करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१७१६१३४९१६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AVINASH SARDAR JADHAV

Digitally signed by AVINASH SARDAR JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=77e749a5820964d03e94305adeb0ee2ffb2c5f02efc5b019e8b49dc59175a25c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA8FDCAA7AE61AB4BED501E19D794BD7197874F2989B98780B1607ADCBDFE844, cn=AVINASH SARDAR JADHAV
Date: 2023.07.24 12:59:12 +05'30'

**( अ. स. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव-२, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई.

८) आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई.
९) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई.
१०) आयुक्त, State CET Cell, मुंबई.
११) संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
१२) संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई.
१३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१४) उप संचालक, आरोग्य सेवा (सर्व परिमंडळे).
१५) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व).
१६) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व).
१७) वैद्यकीय अधीक्षक (सर्व).
१८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१९) निवडनस्ती (सेवा-३).